जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या कार्यालयातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अस्थाप २०१६ /प्र.क्र.३८/कामगार-९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० जुलै, २०१७.

पहा :- १) शासन निर्णय क्र. अस्थाप-२०१६/प्र.क्र.३८/कामगार-९,दिनांक ७ जानेवरी, २०१७
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क. दि. १०/०२/२०१७
३) जिल्हाधिकारी व जिल्हादंडाधिकारी, मुंबई शहर यांचे क्रमांक आस्था/टे-२/आस्थायी पदे/मुदतवाढ प्रस्ताव/२०१७, दिनांक ३/०४/२०१७ चे पत्र

**प्रस्तावना :-**

मुंबई शहर जिल्हयातील कामगार देय व श्रमिक नुकसान भरपाई वसूलीसाठी जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे कार्यालयांतर्गत सन १९७१ पासून ८ अस्थायी पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. सदर आठ पदांना त्यानंतर वेळोवेळी शासन निर्णयाद्वाने मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदरहू पदांना उपरोक्त अनुक्रमांक १ येथील दिनांक ७ जानेवरी, २०१७ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०.९.२०१६ ते २८.२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी दिली होती. आता, जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून उपरोक्त अनुक्रमांक ३, दिनांक ३/०४/२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन सदरहू मंजूर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासनाने याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई शहर जिल्हयासाठी कामगार देय व श्रमिक नुकसान भरपाई वसूलीसाठी जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे कार्यालयांतर्गत असलेल्या व खाली नमूद केलेल्या आठ अस्थायी पदे, वित्त विभागाने त्यांच्या क्रमांक डीबीबी-१०९७/प्र.क्र.२६/अर्थसंकल्प-१९, दिनांक २०.१२.१९९७ च्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटीस तसेच सहा किंवा सहा महिन्यापेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त असलेली पदे वगळण्यात यावीत या अटीस अधीन राहून दिनांक ०१.०३.२०१७ ते ३०.९.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

कामगार भविष्य निर्वाह निधी व संकीर्ण तरतूदी अधिनियम,१९५२ व इतर अधिनियमाखालील देय रकमांच्या वसूलीसाठी खालील पदे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | तहसिलदार (राजपत्रित) | रु. १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५००० | १ |
| २ | रोखपाल तथा लिपिक | रु.५२००- २०२०० ग्रेडवेतन १९०० | १ |
| ३ | लिपिक /टंकलेखक | रु. ५२००- २०२०० ग्रेडवेतन १९०० | १ |
| ४ | महसूल निरीक्षक | रु. ५२००- २०२००ग्रेडवेतन १९०० | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | नोटीस वाहक | रु.४४४०-७४४० ग्रेडवेतन १६०० | १ |
| ६ | शिपाई | रु.४४४०-७४४० ग्रेडवेतन १६०० | १ |
| | | एकूण | ६ |
| श्रमिक नुकसान भरपाई अधिनियमाखालील देय रकमांच्या वसुलीसाठी पुढीलप्रमाणे अस्थायी पदे आहेत. | | | |
| ७ | कनिष्ठ लिपिक | रु.५२००- २०२०० ग्रेडवेतन १९०० | १ |
| ८ | नोटीस वाहक | रु.४४४०-७४४० ग्रेडवेतन १६०० | १ |
| | | एकूण | २ |
| | एकूण | (६+२) | एकूण ८ पदे |

वरील पदधारकांना जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा यांचे कार्यालयातील अशाच प्रकारचे वसूलीचे काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना देण्यात येणारे विशेष भत्ता, वाहन भत्ता तसेच शासनाचे वेळोवेळी मंजूर केलेले इतर भत्ते देण्यात यावेत.

या पदांच्या वेतन व भत्ते यासाठी होणारा खर्च हा "मुख्य लेखाशीर्ष २२३०-कामगार व सेवायोजन (०१) कामगार १११ कामगारांसाठी सामाजिक सुरक्षितता (००) (०२) कामगार भविष्य निर्वाह निधी व इतर अधिनियम यासंबंधीचे खर्च (२२३० ०६१२) मागणी क्रमांक के-४" या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन, तो सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिताच्या मंजूर अनुदानातूनच भागविण्यात यावा.

प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/ २००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर,२००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

वरील पदे कामगार विभागांतर्गत कामगारांना देय असलेल्या तथापि, प्रलंबित रकमांच्या वसूलीच्या कामाव्यतिरिक्त कामगार विभागाशी संबंधित कामे जसे की, बाल कामगार निर्मूलन करण्यासाठी करावयाची कामे व इतर कामगार कायद्याची अंमलबजावणी विषयक कामांव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामांसाठी जिल्हाधिकाऱ्यांनी वापरु नयेत तसेच वित्त विभागाच्या क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क. दि-१० फेब्रुवारी,२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व सदर पदांच्या आकृतीबंधाची कार्यवाही विहीत वेळेत पार पाडण्यात येईल केवळ या अटींवर वरील पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०७२०१६३३०८८५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra T Jadhav

Digitally signed by Ravindra T Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=603978b5660f0eca32742a306629627cab3d44b5023a7b6ae5f7a2ad9b25432f, cn=Ravindra T Jadhav
Date: 2017.07.20 16:36:34 +05'30'

**( रविंद्र जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) कामगार आयुक्त (महाराष्ट्र राज्य), बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई
२) जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकातघर, फोर्ट, मुंबई-४०० ००१. (५ प्रती)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य मुंबई,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९)/(व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७) कार्यासन अधिकारी (प्रशासन-१),उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८) निवड नस्ती (कामगार-९), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.